सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीचे पुनर्विनियोजन "मागणी क्र.ओ-१० प्रधान लेखाशिर्ष ५४५२ पर्यटनावरील भांडवली खर्च.."

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.११/का.१४४४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २० मार्च, २०२३.

**प्रस्तावना :-**

मंत्रिमंडळाच्या मान्यतेने व मा.उच्च न्यायालयाच्या दि.१५.०६.२०२२ रोजीच्या आदेशास अनुसरुन महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.८४/फ-९, दि.२७ जुलै, २०२२ अन्वये लोणार सरोवराचे संरक्षण, संवर्धन व जतन करण्यासाठी विविध विभागांच्या माध्यमातून करावयाच्या कामांचा अंदाजित रु.३६९७८.७७ लक्ष रक्कमेच्या लोणार सरोवर विकास आराखडयास मान्यता देण्यात आली आहे. "लोणार सरोवर विकास आराखडया" अंतर्गत समाविष्ट मंजूर कामे विहित कालावधीत पूर्ण करण्याकरिता विविध विभागांतर्गत कामे सोपविण्यात आलेली आहेत. तसेच मा.उच्च न्यायालय (नागपूर खंडपीठ) यांच्या दि.२६.०७.२०२२ रोजीच्या आदेशान्वये लोणार सरोवर विकास आराखडयातील कामे विहित कालावधीत पूर्ण करण्याकरिता, लोणार सरोवर विकास समिती करिता रु.१०.०० कोटी निधी राज्य शासनाने या आदेशाच्या दिनांकापासून दोन आठवडयात उपलब्ध करुन देण्याचे निदेश दिले आहेत.

उपरोक्त निदेशास अनुसरुन सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात **"लोणार सरोवर विकास"** आराखडयाकरिता पुनर्विनियोजनाने निधी उपलब्ध करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"श्री क्षेत्र गणपतीपुळे, ता. व जि.रत्नागिरी तीर्थक्षेत्र विकास आराखडा" मधून आर्थिक वर्ष सन २०२२-२३ अंतर्गत मागणी क्र. ओ-१०, प्रधान लेखाशिर्ष ५४५२, पर्यटनावरील भांडवली खर्च,०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा,१०१-पर्यटन केंद्रे, (००) (११) "श्री क्षेत्र गणपतीपुळे, ता. व जि.रत्नागिरी तीर्थक्षेत्र विकास आराखडा" (कार्यक्रम), (५४५२ ०१७८) "५३ मोठी बांधकामे"या योजनेअंतर्गत बचतीमधून उपलब्ध होणाऱ्या रु.१०.०० कोटी इतकी रक्कम, सोबतच्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे पुनर्विनियोजनाने "लोणार सरोवर विकास आराखडया"करिता मागणी क्रमांक ओ-१०, प्रधान लेखाशिर्ष ५४५२, पर्यटनावरील भांडवली खर्च,०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा,१०१-पर्यटन केंद्रे, (००) (१२) लोणार सरोवर विकास आराखडा (कार्यक्रम) (५४५२ ०१८७) "५३ मोठी बांधकामे" या उद्दिष्टासाठी एकुण रु.१०.०० कोटी (रुपये दहा कोटी फक्त) इतकी तरतूद पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७ एप्रिल,२०१५ अन्वये वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन, परिच्छेद १६२,१६३ व १६४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६९/२०२३/व्यय-८, दि.१४.०२.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०३२०१४५६४४८११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: CN = MILIND RAGHUNATH KULKARNI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PLANNING DEPARTMENT
Date: 2023.03.20 15:01:37 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव,**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
४) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
५) विभागीय आयुक्त, अमरावती तथा अध्यक्ष, लोणार विकास समिती.
६) जिल्हाधिकारी, बुलढाणा.
७) जिल्हा नियोजन अधिकारी, बुलढाणा.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.
९) अपर मुख्य सचिव, नियोजन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती, का.१४४४, नियोजन विभाग, मुंबई.

**अर्थसंकल्पीय अनुदान वर्ष २०२२-२३ मागणी क्र.ओ-१०, ५४५२-पर्यटनावरील भांडवली खर्च या लेखाशीर्षांतर्गत पुनर्विनियोजन करणेबाबत..**

(नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.११/का.१४४४, दि. २० मार्च, २०२३.)

| योजनेचे नाव | लेखाशीर्ष/ उद्दिष्ट | अर्थसंकल्पित निधी (रु. हजारात) | पुनर्विनियोजनाची रक्कम (रु.हजारात) | पुनर्विनियोजना नंतरची रक्कम (रु.हजारात) | पुनर्विनियोजनाची कारणे |
|---|---|---|---|---|---|
| श्रीक्षेत्र गणपतीपुळे तीर्थक्षेत्र,ता.जि. रत्नागिरी | मागणी क्र.ओ-१० ५४५२ ०१७८ ५३ मोठी बांधकामे | ४७२९००.०० | (-) १०,००,००.०० | ३७२९००.०० | मा.उच्च न्यायालय (नागपूर खंडपीठ) यांच्या दि.२६.०७.२०२२ रोजीच्या आदेशान्वये लोणार सरोवर विकास आराखडयातील कामे विहित कालावधीत पूर्ण करण्याबाबत. |
| लोणार सरोवर विकास आराखडा | मागणी क्र.ओ-१० ५४५२ ०१८७ ५३ मोठी बांधकामे | १००० (पूरक मागणी) | (+)१०,००,००.०० | १०,००,००.०० | |

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: CN = MILIND RAGHUNATH KULKARNI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PLANNING DEPARTMENT
Date: 2023.03.20 15:01:54 +05'30'

( मिलिंद कुळकर्णी )
उप सचिव